**ना. म. जोशी मार्ग येथील बी. डी. डी. चाळींच्या पुनर्विकासासाठी प्राप्त लाभार्थींची पात्रता निश्चित करणे व अन्य अनुषंगिक बाबींसाठी सक्षम प्राधिकारी यांच्या नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विविचा २०१६/प्र.क्र. २६१ (भाग-१)/गृनिप**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १४ जून, २०१७

वाचा - १) शासन निर्णय क्रमांक : विविचा २००७/प्र.क्र. ५१ (भाग-१)/गृनिप, दि. ३० मार्च, २०१६.
२) शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्रमांक : टिपीबी ४३१३ /४००/ प्र.क्र. १०४/२०१६/नवि-११, दि. २७ डिसेंबर, २०१६.
३) शासन निर्णय क्रमांक : विविचा २०१६/प्र.क्र. २६१/गृनिप, दि. ०१ मार्च, २०१७

प्रस्तावना -

महाराष्ट्र शासनाच्या संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मुंबईतील वरळी, नायगाव, ना. म. जोशी मार्ग व शिवडी येथील मुंबई विकास विभाग (बी.डी.डी.) चाळींचा पुनर्विकास करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर पुनर्विकासासाठी संदर्भाधिन क्र. २ येथील अधिसूचने अन्वये बृहन्मुंबई विकास नियंत्रण नियमावलीमध्ये नविन विनियम ३३ (९) (ब) अंतर्भूत करण्यात आलेला आहे.

तसेच संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये वरळी येथील बी.डी.डी. चाळींच्या पुनर्विकास करण्यात येत असलेल्या क्षेत्रातील पुनर्विकासासाठी पात्र लाभार्थींची पात्रता निश्चिती करणे व अन्य अनुषंगिक बाबींसाठी उपजिल्हाधिकारी (अति / निष्कासन) कुलाबा विभाग, मुंबई शहर यांना आणि नायगाव व ना. म. जोशी मार्ग येथील बी.डी.डी. चाळींच्या पुनर्विकास करण्यात येत असलेल्या क्षेत्रातील पुनर्विकासासाठी पात्र लाभार्थींची पात्रता निश्चिती करणे व अन्य अनुषंगिक बाबींसाठी उपजिल्हाधिकारी (अति / निष्कासन) धारावी विभाग, मुंबई शहर यांना सक्षम प्राधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आलेले आहे. आता, नायगाव व ना. म. जोशी मार्ग येथील लाभार्थ्यांची पात्रता निश्चित करणे सत्वर पुर्ण करणे आवश्यक असल्याने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय -

संदर्भ क्र. ३ येथील दि.०१.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुंबईतील ना. म. जोशी मार्ग येथील बी.डी.डी. चाळींच्या पुनर्विकासासाठी लाभार्थींची पात्रता निश्चिती करणे व अन्य अनुषंगिक बाबींसाठी उपजिल्हाधिकारी (अति / निष्कासन) धारावी विभाग, मुंबई शहर यांची सक्षम प्राधिकारी म्हणून करण्यात आलेली नियुक्ती रद्द करण्यात येत असुन त्याऐवजी उपजिल्हाधिकारी (अति / निष्कासन) कुलाबा विभाग, मुंबई शहर यांना सदर प्रयोजनार्थ सक्षम प्राधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच संदर्भ क्र. ३ येथील दि.०१.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील अन्य तरतुदी कायम राहतील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१४१२१४१८४९०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baliram Pawar

Digitally signed by Baliram Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=befef6531a9fedce4a48730f8247a42dc24c79ec385832aa53bf063e6d139980, cn=Baliram Pawar
Date: 2017.06.14 12:39:22 +05'30'

**( बी. जी. पवार )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-३५.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.

४) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.

५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.

६) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.

७) मा. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.

८) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.

९) महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा).

१०) महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा).

११) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.

१२) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई-०१.

१३) जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई -०१.

१४) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा, मुंबई-५१.

१५) गृहनिर्माण विभागातील सह सचिव / उप सचिव / अवर सचिव.

१६) अपर जिल्हाधिकारी (अति./निष्का.), मुंबई शहर, मुंबई - ०१.

१७) उप जिल्हाधिकारी (अति./निष्का.),कुलाबा विभाग, मुंबई शहर, मुंबई - ०१.

१८) उप जिल्हाधिकारी (अति./निष्का.), धारावी विभाग, मुंबई शहर, मुंबई - ०१.

१९) निवड नस्ती - गृनिप.